प्रशासकीय मान्यता.
रायगड जिल्हयातील मौजे बोरघर हवेली, ता.तळा येथील आदिवासी सांस्कृतिक संकूल बांधकामाच्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
**शासन निर्णय क्र.संकुल- २०१४/प्र.क्र.५७/ का. १७**
मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार इमारत, मुंबई- ४०० ०३२
**दिनांक : ११ ऑगस्ट, २०१४**

**वाचा** :-
१. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग. क्र. संकीर्ण २००१/प्र.क्र. २३८(२००१)/ का-०८, दिनांक १५ मे, २००४
२. शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग क्र. संकीर्ण २०११/प्र.क्र. १११/ का-१७, दिनांक १३ मार्च, २०१२.
३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र. संकुल- २०१४/ प्र.क्र. २७ /का-३(४), दि.२४/०६/२०१४.

**प्रस्तावना :-**

आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी उक्त संदर्भाधिन दिनांक २४ जून,२०१४ च्या पत्रान्वये मौजे बोरघर हवेली, ता. तळा, जि. रायगड येथील जिल्हाधिकारी, रायगड यांनी गट क्र. ५०७ क्षेत्र ३.५१.०० हेक्टर आर आकार रु. २-०० पैकी ०.४० हेक्टर आर जमिन आदिवासी सांस्कृतिक संकुल बांधण्याकामी वर्ग केलेल्या जागेवर आदिवासीकरीता सांस्कृतिक संकूल बांधण्यासाठी रु. १,००,००,०००/- रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव पाठविला आहे. सदर अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाड,जि.रायगड यांनी तयार केले आहे.सदर बांधकामाच्या रु. ९८,११, ४१३/- इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार सदर सांस्कृतिक संकुल बांधकामासाठी रु. ९८,११,४१३/- इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

<u>शासन निर्णय</u> :-

मौजे बोरघर हवेली, ता. तळा, जि. रायगड येथील जिल्हाधिकारी, रायगड यांनी उपलब्ध करुन दिलेल्या गट क्र. ५०७ क्षेत्र ३.५१.०० हेक्टर आर आकार रु. २-०० पैकी ०.४० हेक्टर आर जागेवर आदिवासीकरीता सांस्कृतिक संकुलाच्या ६३३.१९ चौ.मी. बांधण्यासाठी रु. ९८,११, ४१३/ ( रु. अठ्ठयाण्ण्व लक्ष अकरा हजार चारशे तेरा फक्त )रकमेच्या अंदाजपत्रकास खालील नमूद अटीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१. सांस्कृतिक संकूल इमारत बांधकामास शासनाने प्रशासकीय मंजूरी दिली असली तरी अर्थसंकल्पीय तरतूद उपलब्ध झाल्याशिवाय काम हाती घेण्यात येऊ नये.

२. जागा मालकी हक्काबाबतची सर्व कागदपत्रकांची खातर जमा करुनच काम हाती घेण्यात यावे.

३. काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तु विशारदांकडून मंजुरी घेऊनच काम सुरु करावे.

४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे साक्षांकन घ्यावे.

५. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग शासन निर्णय क्र.इएनव्ही २०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६. सदर अंदाजपत्रके हे ढोबळ व प्रचलित दरसूचीवर आधारीत आहेत, ते दर अद्ययावत करुन सक्षम प्राधिकरणाकडून तांत्रिक मान्यता घेण्यात यावी तसेच सदर कामाची आर्थिक मर्यादा ही प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या रकमेच्या मर्यादेतच ठेवण्याची दक्षता घेण्यात यावी.

७. आदिवासी विकास विभागाच्या दिनांक १५ मे, २००४ च्या शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या अटीचे ततोतंत पालन करण्यात यावे.

८. विद्युत विषयक बाबींसाठी विद्युत विभागाच्या सक्षम प्राधिका-यांची सहमती प्राप्त करुन घ्यावी.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र. विअप्र-१०.०८/प्रक्र ७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९ च्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उप विभाग-पाच, मधील अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २८१/इमा-२, दिनांक ०४/०८/२०१४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर असून त्याचा संगणक संकेतांक २०१४०८१११२०५५६८२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SANJAY KASHINATH GAMBRE

Digitally signed by SANJAY KASHINATH GAMBRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SANJAY KASHINATH GAMBRE
Date: 2014.08.11 12:07:28 +05'30'

( **सं. का. गंब्रे** )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री /मा.राज्यमंत्री आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
२. मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
३. मा.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक बांधकाम विभाग, रायगड
५. अधिक्षक अभियंता, रायगड (सा.बां.) मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई

६. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
७. अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे
८. कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाड, जिल्हा रायगड
१०.प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय, पेण, जिल्हा रायगड
११.सहाय्यक अभियंता श्रेणी -१, सार्वजनिक बांधकाम उपविभाग माणगांव, जिल्हा रायगड
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
१३.वित्त विभाग (विनियम), (व्यय-१४), मंत्रालय, मुंबई -३२
१४.उप सचिव (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई - ३२
१५.अवर सचिव/कक्ष अधिकारी, का-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
१६.निवड नस्ती (का.१७)